**नारळ विमा योजनेची प्रायोगिक तत्वावर**
**अंमलबजावणी करणेबाबत**

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्र नाविमा २००९/प्र.क्र.१७४/१३अे,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २९ सप्टेंबर, २०१०

**पहा :-** भारत सरकार कृषि मंत्रालय कृषि व सहकार विभाग, कृषि भवन, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक १३०११/०३/२००७-क्रेडीट-II, दिनांक २९/९/२००९ व त्यासोबतची सहपत्रे

**प्रस्तावना -**

नारळाच्या पिकास वातावरणातील बदल, नैसर्गिक आपत्ती, किटक, आग व तत्सम बाबी तसेच रोगांपासून धोका असतो. नारळ हे कोरडवाहू पिक असून ते जैविक व अजैविक रोगांना बळी पडते. सद्यस्थितीत नारळ पिकासह कोणत्याही फळपिकाकरीता फळ विमा योजना राबविण्यात येत नाही. सबब लघु सिमान्त शेतकऱ्यांना नारळ पिकाकरीता फळपिक विमा योजनेद्वारे संरक्षण देणे गरजेचे आहे. सबब, नारळ विमा योजना राज्यात सन २०१०-११ मध्ये प्रायोगिक तत्वावर ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधूदुर्ग या जिल्ह्यात राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्यातील ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधूदुर्ग या जिल्ह्यात सन २०१०-११ पासून नारळ विमा योजना प्रायोगिक तत्वावर राबविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजना भारतीय कृषि विमा कंपनीद्वारे राबविण्यात येणार असून या योजनेचे भौतिक उद्दिष्ट ९०० हे. असून या योजनेसाठी वित्तीय भार रूपये ६.४५ लक्ष इतका आहे. सदर वित्तीय भारापैकी ५०% म्हणजेच रूपये ३.२२५ लक्ष इतका हिस्सा नारळ विकास मंडळ (कृषि मंत्रालय, भारत सरकार), केरा भवन, कोची, केरळकडून उपलब्ध करून देणार असून राज्य शासनाचा हिस्सा व शेतकऱ्याचा हिस्सा प्रत्येकी २५% म्हणजेच प्रत्येकी रूपये १.६१२ लक्ष (रूपये एक लक्ष एकसष्ट हजार दोनशे फक्त) इतका राहील.

सदर प्रयोजनार्थ राज्य हिश्श्यापोटी होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ करीता करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.
मागणी क्रमांक डी-३ २४०१, पीक संवर्धन
११९ बागायती व भाजीपाला पीके
(०१)(१८) नारळ विकास मंडळ पुरस्कृत- कार्यक्रम
लेखाशिर्ष संकेतांक (२४०१ २९३४)

या प्रकरणी **सहाय्यक संचालक लेखा, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने अनौपचारीक संदर्भ क्रमांक ७२६९/का.१४३१, दिनांक १५/९/२०१० अन्वये व वित्त विभागाच्या मान्यतेने अनौपचारीक संदर्भ क्रमांक १९२/१०/व्यय-१, दिनांक २१/९/२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेबाबतच्या मार्गदर्शक सुचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक (२०१००९२९१६०५२९००१ ) असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( जी. के. राऊत )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

नारळ विकास मंडळ, कोची
प्रादेशिक व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, २० वा मजला, स्टॉक एक्सचेंज, मुंबई-२३.
संचालक, पिक विमा भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग, नवी दिल्ली.
कृषि आयुक्त, कृषि आयुक्तालय, पुणे.
संचालक (फलोत्पादन), पुणे
विभागीय कृषि सह संचालक, ठाणे
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, ठाणे/रायगड/रत्नागिरी/सिंधूदुर्ग
अध्यक्ष व कार्यकारी संचालक, भारतीय कृषि विमा कंपनी, १३ वा मजला, अंबादिप बिल्डींग, कस्तूरबा गांधी मार्ग, कॅनॉट प्लेस, नवी दिल्ली.
विभागीय आयुक्त, कोकण विभाग,
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
विमा संचालक म्हाडा इमारत, १ला मजला, बांद्रा (पू.), मुंबई.
मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, पुणे
जिल्हाधिकारी, ठाणे/रायगड/रत्नागिरी/सिंधूदुर्ग
मुख्य कार्यकारी अधिकारी, ठाणे/रायगड/रत्नागिरी/सिंधूदुर्ग
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/रायगड/रत्नागिरी/सिंधूदुर्ग
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षाअधिकारी, मुंबई
संचालक लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई ( २ प्रती)
सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२,
सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य
माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
नियोजन विभाग,
वित्त विभाग (व्यय-१ ) अर्थसंकल्प -३,१२,
सह सचिव/सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषी व फलो. विभाग,मंत्रालय,मुंबई
मा.लोक आयुक्त / मा. उपलोकआयुक्त , नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२.
निवड नस्ती